**श्री. गजानन डोमाजी कामडे, वरिष्ठ भूवैज्ञानिक (गट अ) यांना जिल्हा खनिकर्म अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, चंद्रपूर या रिक्त पदावर बदलीने पदस्थापना देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
शासन आदेश क्र.एमएनए १०१५/ प्र. क्र. ६७/उद्योग-९,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ०३.११.२०१६.

पहा- ०१. शासन समक्रमांक आदेश, दिनांक १८.०८.२०१६.

**प्रस्तावना-**

भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर यांचे आस्थापनेवरील वरिष्ठ भूवैज्ञानिक (गट अ) या संवर्गातील श्री. से. पु. आवळे, तत्कालीन जिल्हा खनिकर्म अधिकारी, चंद्रपूर यांना उपसंचालक (गट अ) या संवर्गामध्ये दिनांक १८.१०.२०१६ च्या आदेशान्वये प्रादेशिक कार्यालय, औरंगाबाद येथे तात्पुरती पदोन्नती देण्यात आली असून श्री. आवळे यांनी उपसंचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, प्रादेशिक कार्यालय, औरंगाबाद या पदाचा कार्यभार स्वीकारल्याने जिल्हा खनिकर्म अधिकारी, चंद्रपूर हे पद रिक्त आहे. सदर पद बदलीने भरण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन आदेश**

श्री. गजानन डोमाजी कामडे हे भूविज्ञान व खनिकर्म संचालनालयाच्या आस्थापनेवर वरिष्ठ भूवैज्ञानिक (गट अ) या पदावर भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, प्रादेशिक कार्यालय, चंद्रपूर येथे कार्यरत आहेत.

२. श्री. गजानन डोमाजी कामडे, वरिष्ठ भूवैज्ञानिक (गट अ) यांना सदर शासन आदेशान्वये रिक्त असलेल्या जिल्हा खनिकर्म अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, चंद्रपूर या पदावर बदलीने पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिका-याचे नाव व संवर्ग | सद्याचे ठिकाण / कार्यालय व पदनाम | बदलीने पदस्थापनेचे ठिकाण / कार्यालय व पदनाम |
|---|---|---|---|
| ०१ | श्री. गजानन डोमाजी कामडे, वरिष्ठ भूवैज्ञानिक (गट अ) | वरिष्ठ भूवैज्ञानिक (गट अ), भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, प्रादेशिक कार्यालय, चंद्रपूर | जिल्हा खनिकर्म अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, चंद्रपूर. |

३. श्री. कामडे यांना सूचित करण्यात येते की, त्यांनी बदलीच्या ठिकाणी / पदावर ०७ दिवसाच्या आत रुजू व्हावे. ०७ दिवसात रुजू न झाल्यास कडक कारवाई करण्यात येईल, याची कृपया दक्षता घ्यावी.

४. संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी श्री. कामडे यांच्या रुजू अहवालाची प्रत शासनास तात्काळ सादर करावी.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१६११०३१४०५३८२६१० असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Suresh Lalji Bhoi

Digitally signed by Suresh Lalji Bhoi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Suresh Lalji Bhoi
Date: 2016.11.08 15:19:04 +05'30'

**(सु. ला. भोई)**
कक्ष अधिकारी

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर.
३) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई. यांना पत्राद्वारे.*
४) उपसंचालक, प्रादेशिक कार्यालय,भूविज्ञान व खनिकर्म, चंद्रपूर.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर.
६) संबंधित अधिकारी श्री. गजानन डोमाजी कामडे (संचालकामार्फत).
७) मा. मंत्री (खनिकर्म) यांचे खाजगी सचिव / विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई ३२.
८) मा.राज्यमंत्री (खनिकर्म) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई ३२.
९) प्रधान सचिव (उद्योग), यांचे स्वीय सहायक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग. मंत्रालय, मुंबई ३२.
१०) उपसचिव (खनिकर्म), यांचे स्वीय सहायक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
११) निवड नस्ती (उद्योग-९).